**जलसंपदा प्रकल्पांना प्रशासकीय मान्यता देण्याचे पाटबंधारे विकास महामंडळांचे वित्तीय अधिकार मराठवाडा व विदर्भातील ६ जिल्हयापुरते सिमित करण्याबाबत.**

महाराष्ट्र शासन
जलसंपदा विभाग,
शासन निर्णय क्रमांक-प्रमाअ-२००९/(३४/०९)/जसंनि
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांकः २१ ऑगस्ट, २००९.

वाचाः १) शासन निर्णय, पाटबंधारे व ऊर्जा विभाग,क्रमांक-एपीएस-१०.७३/३२६५३-इ (३), दि.१७.७.१९७४.

२) शासन निर्णय,जलसंपदा विभाग, क्रमांक-संकीर्ण-१०९९/(१६६/९९)/जसंअ, दि.२३ जून,१९९९.

३) शासन निर्णय, वित्त विभाग,क्रमांक-विअप्र-१०.०४/प्र.क्र.३३/२००४/विनियम,दि.२९.११.२००५.

४) शासन निर्णय, वित्त विभाग,क्रमांक-विअप्र-१०.०६/प्र.क्र.३८/२००६/विनियम,दि.२८.७.२००६.

५) शासन निर्णय, वित्त विभाग,क्रमांक-विअप्र-१०.०६/प्र.क्र.३३/२००६/विनियम,दि.१८.९.२००६.

६) शासन निर्णय, वित्त विभाग,क्रमांक-विअप्र-१०.०६/प्र.क्र.३३/२००६/विनियम,दि.१३.११.२००६.

७) शासन निर्णय, वित्त विभाग,क्रमांक-विअप्र-१०.०६/प्र.क्र.८२/२००६/विनियम,दि.१३.३.२००७

८) शासन निर्णय, वित्त विभाग,क्रमांक-विअप्र-१०.०६/प्र.क्र.८२/२००६/विनियम,दि.४.४.२००७

९) शासन निर्णय, वित्त विभाग,क्रमांक-विअप्र-१०.०६/प्र.क्र.८२/०६/विनियम, दि.१०.०४.२००७.

१०) शासन निर्णय,जलसंपदा विभाग, क्रमांक-प्रमाअ-२००७/(१२८/०७)/जसंनि, दि.११ एप्रिल,२००७.

११) शासन निर्णय,जलसंपदा विभाग, क्रमांक-प्रमाअ-२००७/(१२८/०७)/जसंनि, दि.११ जून,२००७.

१२) शासन निर्णय,जलसंपदा विभाग, क्रमांक-प्रमाअ-२००७/(३०५/०७)/जसंनि, दि.२१.११.२००७.

**प्रस्तावनाः-**

उपरोक्त शासन निर्णय, क्रमांक-१ अन्वये तेव्हाच्या पाटबंधारे विभागास दिलेले प्रशासकीय मान्यतेचे अधिकार उपरोक्त शासन निर्णय क्रमांक-३ अन्वये सिमीत करण्यात आले. महामंडळांचे नियमातील कलम २५ व महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण कायद्यामधील कलम ११ (च) परिच्छेद ३ येथील तरतुदीस अनुसरुन जलसंपदा विभागाकडील विदर्भ व मराठवाडयातील विदर्भ पाटबंधारे विकास

महामंडळ व गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ या पाटबंधारे विकास महामंडळांना त्यांच्या कार्यक्षेत्रांतर्गत विदर्भ व मराठवाडयातील सर्व जिल्हयातील मोठे,मध्यम व लघु जलसंपदा प्रकल्प तसेच उपसा सिंचन योजनांना प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याचे अधिकार शासन निर्णय क्रमांक १० नुसार प्रदान करण्यात आले होते.

यासंदर्भात दिनांक २१.८.२००७ रोजी मा.राज्यपाल यांच्या सचिवाबरोबर झालेल्या बैठकीचे कार्यवृत्त मा.राज्यपाल यांचे कार्यालयाच्या दिनांक ५ सप्टेंबर,२००७ च्या पत्राने प्राप्त झाले.सदर पत्रान्वये दिलेल्या निर्णयानुसार औरंगाबाद, जालना, बीड, उस्मानाबाद, लातूर, बुलढाणा, अकोला (वाशिमसह),अमरावती, यवतमाळ आणि गडचिरोली या १० जिल्हयातच आर्थिक अनुशेष असल्याने मा.राज्यपालांनी वित्त विभागाचा दिनांक १३ मार्च २००७ च्या व त्यानंतर जलसंपदा विभागाने दिनांक ११ जून,२००७ च्या शासन निर्णयात दुरुस्त्या करण्याचे निर्देश दिले होते. त्यानंतर उपरोक्त शासन निर्णय क्र.१२ अन्वये उपरोक्त शासन निर्णय क्र.११ च्या आदेशांना स्थगिती देण्यात आली आहे.

दरम्यान, सिंचनाच्या दिनांक ३१ मार्च २००८ अखेर असलेल्या आर्थिक अनुशेषाचा आढावा घेतला असता असे आढळले की, मराठवाडयातील जालना व उस्मानाबाद आणि विदर्भातील बुलढाणा,अकोला,वाशिम व गडचिरोली या ६ जिल्हयातच सिंचनाचा आर्थिक अनुशेष आहे. महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण अधिनियम २००५ च्या कलम ११(च) व कलम २३ च्या अनुषंगाने मराठवाडा व विदर्भातील सर्व जिल्हयांऐवजी वरीलप्रमाणे सिंचनाचा आर्थिक अनुशेष असलेल्या ६ जिल्हयापुरतेच जलसंपदा प्रकल्पांना प्रशासकीय मान्यता देण्याचे पाटबंधारे विकास महामंडळांचे अधिकार सिमीत करण्याचे शासनाचे विचाराधीन होते.

**शासन निर्णय :-**

जलसंपदा विभागाअंतर्गत असलेल्या गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ व विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ यांच्या कार्यक्षेत्राअंतर्गत सर्व जिल्हयातील मोठे, मध्यम व लघु जलसंपदा प्रकल्प तसेच उपसा सिंचन योजनांना प्रशासकीय मान्यता देण्याचे यापूर्वी देण्यात आलेले अधिकार सध्या दिनांक ३१ मार्च २००८ अखेर आर्थिक अनुशेष असलेल्या मराठवाडयातील जालना व उस्मानाबाद तसेच विदर्भातील बुलढाणा,अकोला,वाशिम, व गडचिरोली या ६ जिल्हयांपुरते सीमित करण्यात येत आहेत.

हा शासन निर्णय मा.राज्यपाल यांच्या मान्यतेने पत्र क्र. GS/DB/IRG-DIR-23/2009/490, Dated 7may,2009 नुसार घेण्यात आला आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा सांकेतांक २००९०८२४१६२०१४००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**( व्यं.वि.गायकवाड )**
सचिव (जलसंपदा)

प्रति,

मा. राज्यपाल यांचे सचिव,राजभवन,मलबार हिल,मुंबई.
अप्पर आयुक्त व सदस्य सचिव वैधानिक विकास महामंडळे, नागपूर/औरंगाबाद.
मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा.मंत्री जलसंपदा (कृखोपामं वगळून) व लाक्षेवि यांचे स्वीय सहायक,
मा.राज्यमंत्री जलसंपदा यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, १/२, नागपूर,
सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग यांचे स्वीय सहायक,
सचिव(लाक्षेवि), जलसंपदा विभाग यांचे स्वीय सहायक,
सचिव,महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण,मुंबई.
कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर,
कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद,
सर्व कार्यकारी संचालक,पाटबंधारे विकास महामंडळे
सर्व मुख्य अभियंता,जलसंपदा विभाग
सर्व मुख्य अभियंता व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
उप सचिव मोप्र-१/मोप्र-२/लपा/निवसं/सिंव्य/लाक्षेवि, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
कार्यासन-मोप्र-१/मोप्र-२/मप्र/लपा-१/लपा-२/खारभूमी/निवसं-१/निवसं-३/सिं.व्य.(कामे)/लाक्षेवि(कामे)
जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
जसंअ/जसंनि कार्यासन संग्रहार्थ.